विमानप्रवास सवलतीसाठी अमेरिकन एक्सप्रेस
इंडियन एअरलाइन्स गोल्ड/सिल्व्हर (ग्रीन)कार्डची
सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत---

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय,क्र : संकीर्ण-१००४/प्र.क्र.४७ (अ)/सेवा-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ११ जानेवारी,२००५.

पहाः- (१) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.प्रवास-१०९८/प्र.क्र.७४/९८/सेवा-५, दि. ४डिसेंबर,१९९९
(२) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर, २००१.
(३) शासन शुध्दीपत्रक,वित्त विभाग,क्र.१००३/प्र.क्र.६/सेवा-५,दि. १७ जानेवारी,२००३.

## शासन निर्णय

प्रवास भत्यावरील, मुख्यत्वे विमान प्रवासावरील खर्च कमी व्हावा म्हणून शासनाने वरील (२) येथील आदेशान्वये काटकसर विषयक उपाययोजना जाहीर केल्या आहेत. या उपाययोजनांचा एक भाग म्हणून ज्या अधिका-यांना विमान प्रवास अनुज्ञेय आहे, त्या अधिका-यांच्या विमान प्रवासाच्या खर्चात बचत होण्यासाठी त्यांना अमेरिकन एक्सप्रेस सर्व्हिस इंडिया लिमिटेड, मुंबई या कंपनीने मुंबई आणि दिल्ली येथे उपलब्ध करुन दिलेल्या "अमेरिकन एक्सप्रेस इंडियन एअरलाईन्स गोल्ड/सिल्व्हर (ग्रीन) कार्ड" च्या सुविधेचा लाभ देण्याची व अशा कार्डच्या फी च्या रकमेची प्रतिपूर्ती शासनाकडून करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. शासन यासंदर्भात खालीलप्रमाणे आदेश देत आहे :

२. (अ) शासकीय दौरा आणि बदलीनंतर ज्या अधिका-यांना विमान प्रवास अनुज्ञेय आहे त्या अधिका-यांनी त्यांना अनुज्ञेय असणा-या विमानाच्या वर्गाच्या अनुषंगाने गोल्ड किंवा सिल्व्हर (ग्रीन) कार्डची स्वतः खरेदी करावी. सध्या सदर कार्डाची उपलब्धता केवळ मुंबई आणि दिल्लीपुरती सीमित असल्याने फक्त मुंबई आणि दिल्ली येथील अधिका-यांनाच या सुविधेचा लाभ घेता येईल.

(ब) अधिका-यांनी सदर कार्डचा उपयोग करुन त्यांच्या पहील्या प्रवासाचे तिकीट खरेदी केल्यानंतरच त्यांना सदर कार्डसाठी आकारण्यात आलेल्या वार्षिक फीची त्यावरील सेवा करासह प्रतिपूर्ती करण्यात येईल. या बाबीवरील खर्च कार्यालयीन खर्चासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

(क) या कार्ड वरच शासकीय दौ-यासाठी व बदलीनंतरच्या प्रवासासाठी विमान प्रवासाच्या सर्व तिकीटांची खरेदी करणे अधिका-यांना बंधनकारक राहील.

(ड) सदर कार्ड धारकास मिळणा-या अन्य सवलतीचा विनियोग कार्डधारक अधिका-यांनी शासकीय प्रयोजनार्थ करणे अपेक्षित आहे.

(इ) सर्व मंत्रालयीन विभागांनी हे आदेश त्यांच्या अखत्यारीतील विमान प्रवास अनुज्ञेय असणा-या अधिका-यांच्या निदर्शनास आणून त्यांची तात्काळ अंमलबजावणी होईल असे पहावे. संबंधित संस्थेचा संपर्कासाठीचा पत्ता खाली नमूद केला आहे :

अमेरिकन एक्सप्रेस सर्व्हिस इंडिया लिमिटेड, एपीजे बिझिनेस सेंटर,एपीजे हाऊस, ३ दिनशॉ वाच्छा रोड, चर्चगेट, मुंबई-४०० ०२० (दूरध्वनी क्र. २२८०१२१०, २२८०१२२०, मोबाईल दूरध्वनी क्र. ९८२१६१४३३३, ९८२०१०४६९३; फॅक्स क्र. २२८०१२०१, २२८०१२०२ )

३. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापूर्वी ज्या अधिका-यांनी सदर कार्डाची खरेदी केली असेल त्यांनाही या आदेशातील तरतुदींचा लाभ अनुज्ञेय असेल.

४. या कार्डचा वापर करुन विमान प्रवासावरील खर्चात झालेल्या बचतीचा शासन वार्षिक आढावा घेईल. त्या अनुषंगाने योग्य त्या नोंदी संबंधित कार्यालयांनी ठेवाव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नावाने,

**शु. श. कारेकर**
**शासनाच्या उप सचिव.**

प्रति,

प्रधान महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
राज्यपालाचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
विशेष आयुक्त व प्रधान सचिव, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली
* प्रबंधक,उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
* पत्राद्वारे
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
*प्रबंधक,लोक आयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
मंत्रालयीन सर्व विभाग
मुख्य सचिव सव सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक/स्वीय सहायक
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
अमेरिकन एक्सप्रेस सर्व्हिस इंडिया लिमिटेड, एपीजे बिझिनेस सेंटर, एपीजे हाऊस,३ दिनशॉ वाच्छा रोड, चर्चगेट, मुंबई - ४०० ०२०.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
निवड फाईल, वित्त विभाग / सेवा-५.

- - - - - - -